CIIL-KVS MOTHERTONGUE SERIES

APNI BOLI



# मराठी वाचनपाठ

(पुस्तक पहिले)


सल्लागार

डॉ. देवीप्रसन्न पट्टनायक

डॉ. बालगोविन्द मिश्र

लेखिका

सौ. राज्यश्री सुब्बय्या







न्ट्रल इन्स्टिटच्यूट ऑफ इंडियन लँग्वेजेस, मैसूर

CIIL- KVS MOTHERTONGUE SERIES

APNI BOLI



# मराठी वाचनपाठ

(पुस्तक पहिले)

सल्लागार

डॉ. देवीप्रसन्न पट्टनायक

डॉ. बालगोविन्द मिश्र

लेखिका

सौ. राज्यश्री सुब्बय्या






सेन्ट्रल इन्स्टिटयूट ऑफ इंडियन लँग्वेजेस मैसूर

# FOREWORD

THE CENTRAL INSTITUTE of Indian Languages was set up on the 17th July 1969 with a view to assisting and co-ordinating the development of Indian languages. The Institute was charged with the responsibility of serving as a nucleus to bring together all the research and literary out-put from the various linguistic streams to a common head and narrowing the gap between basic research and developmental research in the fields of languages and linguistics in India.

The Institute and its four Regional Language Centres are thus engaged in research and teaching which lead to the publication of a wide-ranging variety of materials. Prepara tion of materials designed for teaching and learning at different levels and suited to specific needs is one of the major areas of interest of the Institute. Basic research relating to the acquisition of language and the study of language in its manifold pyscho-social relations constitute another broad range of its interest. The publications include materials produced by the members of the staff of the Central Institute of Indian Languages and its Regional Language Centres and associated scholars from universities and institutions, both Indian and foreign.

At the request of the Kendriya Vidyalaya Sangathan and with their co-operation, the Institute has initiated the CIIL-KVS Mother-tongue Series in order to facilitate instruction in the mother-tongues of those pupils of the Kendriya Vidyalayas who have not so far had any opportunity to learn formally their mother-tongues. These books are different from the usual language books in several ways. Firstly, the books have in view a composite group of pupils from classes IV to VIII in a single class. Secondly, the time available is limited to only 33 hours per year. The full course is divided into four levels. Considerable familiarity in at least the daily use of the language concerned is assumed on the part of the students. Hence the emphasis is given in reading and writing skills and on the skill to use the appropriate style in the various social contexts. Exercises have been prepared with utmost care to test the student's mastery of the proposed skills objectively. The curriculum format and lesson-to-lesson instructions for the teachers to follow are detailed in the teachers' manual. The script-book, the copy-book and the text-book for the four levels have been prepared as a composite package in a graduated course.

Much of the effectiveness of the courses will depend on how they are put to use in the actual classroom. Planned courses are so rare in our country that the habit of following a preplanned schedule is alien to many of our language teachers. It is hoped that the initial resistance to new endeavours will soon be overcome.

Although the scholars from outside and my colleagues have tried their best to perfect the materials for this course, we do not exclude the possibility of defects in them, and will appreciate comments from experts, teachers and parents regarding these materials.

The following persons should be acknowledged for their part in the initial planning of this course :

Miss A. Chari, Commissioner, Kendriya Vidyalaya Sangathan, New Delhi ; Mrs. G. Krishnanand, Deputy Commissioner, KVS, Madras ; Sri S. Ranganathan, Principal, K.V., H.V.F. Estate, Avadi, Madras ; Sri M.T.S. Iyengar, Principal, K.V., ASC Centre, Bangalore ; Sri B. K. Nigam, Principal, K.V., Hubli ; Sri R. Satyanarayana, Principal, K.V., Kozhikode ; Dr. P. N. Dave, Professor of Education, R.C.E., Mysore ; Dr. B. G. Misra, Deputy Director, CIIL, Mysore ; Dr. E. Annamalai, Deputy Director, CIIL, Mysore ; Dr. C.H.K. Misra, Deputy Director, CIIL, Mysore ; and Dr. M.S. Thirumalai, Principal, SRLC, Mysore.

Our thanks are also due to Dr. Asok Kelkar of the Deccan College, Poona, who reviewed the manuscript, to Dr. V. M. Kulkarni of Sholapur who permitted us to reproduce his poem जोत in this book, to Shri H.L.N. Bharati, production in-charge, CIIL, and to M/s Aravinda Printers, Mysore, for prompt and excellent printing.

Debi Prasanna Pattanayak

## अनुक्रमणिका



———

# I ऊठ मुला



ऊठ मुला ऊठ मुला
बघ हा अरुणोदय झाला ॥ ध्रु ॥

किरणे पसरत रवि आला
गुलाल उधळत पूर्वेला
पक्षी अंगणी झाले गोळा
गाती तुला उठवायाला ॥ १ ॥

पक्षी गाती सुस्वर गाणे
फुले हासती डोलती पाने
ऊठ ऊठ तू प्रसन्न वदने
करी प्रार्थना देवाला ॥ २ ॥

## अभ्यास

१) विरुद्धार्थी शब्दांच्या जोड्या लावा. (उदा.—पांढरा × काळा)

| | |
|---|---|
| १) पूर्व | दिवस |
| २) प्रसन्न | रडणे |
| ३) ऊठ | अप्रसन्न |
| ४) हसणे | पश्चिम |
| ५) रात्र | नीज |

२) उदाहरणानुसार खाली दिलेल्या शब्दांची योग्य रूपे द्या.

उदा.—फूल फुले.

१) मूल
२) किरण
३) पान
४) रस्ता
५) खिळा

३) वाक्यांच्या जोड्या जुळवा.

| A | B |
|---|---|
| १) सूर्य उगवताच | देवाची प्रार्थना करावी. |
| २) झाडावर पक्षी | उमलली होती. |
| ३) बागेत खूप फुले | किलबिल करत होते. |
| ४) सकाळी | पूर्व दिशा लाल होते. |

४) उदाहरणानुसार खालील कवितेच्या ओळी गद्यात लिहा.

उदा. — ऊठ मुला ऊठ मुला
बघ हा अरुणोदय झाला

मुला उठ पाहू. हा पहा अरुणोदय, सूर्योदय झाला आहे.

१) किरणे पसरत रवि आला
गुलाल उधळत पूर्वेला

२) ऊठ ऊठ तू प्रसन्न वदने
करी प्रार्थना देवाला

५) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

अ) सकाळी सूर्य कोणत्या दिशेला उगवतो ?

ब) फुले सकाळी काय करतात ?

क) पाने सकाळी काय करतात ?

ड) पक्षी कशासाठी गातात ?

इ) सकाळी उठून काय करायचे असते ?

— ——

# 2 सहकाराचे फळ

एका गावामध्ये दोन मित्र रहात होते. एकाच नाव होत शिवा, दुसऱ्याचं नाव होत भिवा. शिवा होता आंधळा भिवा होता लंगडा. दोघे रोज भीक मागून पोट भरायचे. एकत्र जेवायचे एकाच देवळात रहायचे. दोघांना एकमेकाशिवाय चैन पडायचं नाही.

एकदा जेवण झाल्याबार दोघे गप्पा मारत बसले होते. इतक्यात कसला तरी गोंधळ ऐकू आला. शिवा म्हणाला, " भिवा, कसला रे आवाज येतोय ? " भिवानं पाहिलं. तो म्हणाला, " अरे, गावकरी तर सैरावैरा पळत आहेत. बाप रे ! गावाला आग लागलीय. " आता काय करायचं ? दोघेही खूप घाबरले. एक आंधळा तर दुसरा लंगडा. दोघांनाही पळता येत नाही. आता दोघही मरणार.

इतक्यात शिवाला एक युक्ती सुचली. शिवा म्हणाला, " भिवा. आता एकच उपाय आहे. तू माझ्या खांद्यावर बस आणि मला वाट सांग. मी जोरात पळतो. असं केलं तरच आपल्या दोघांचेही प्राण वाचतील. " हे ऐकून भिवाला फार आनंद झाला.

भिवा शिवाच्या खांद्यावर बसला. शिवा जोरात पळाला. गावाबाहेर जाऊन थांबला.

दोघांनी एकमेकाला मदत केली आणि त्यांचे दोघांचेही प्राण वाचले.



## अभ्यास

१) डोळे नसलेल्या माणसाला आंधळा म्हणतात.

१) पाय नसलेल्या माणसाला —— म्हणतात.
२) हात नसलेल्या माणसाला —— म्हणतात.
३) ऐकू येत नसलेल्या माणसाला —— म्हणतात.
४) बोलता येत नसलेल्या माणसाला —— म्हणतात.
५) डोक्यावर केस नसलेल्या माणसाला —— म्हणतात.

२) दिलेल्या उदाहरणानुसार कंसात दिलेल्या क्रियापदाची योग्य रूपे वापरा.

दोघे भीक मागून पोट भरायचे. (मागणे)

१) माझं —— झाल्यावर मी खेळीन. (वाचणे)
२) तू —— झाल्यावर पाणी भर. (खाणे)
३) तू मला —— सिनेमाला जा. (घेणे)
४) तू मायाला —— आण. (बोलावणे)
५) मी थांबवलं तरी उमेश —— गेला. (पळणे)

३) ला आणि ना यापैकी योग्य ते अक्षर भरा.

१) शिवा —— युक्ती सुचली.
२) दोघां —— भीती वाटली.
३) कमल —— खाऊ मिळाला.
४) उमेश —— पहिले बक्षिस मिळाले.
५) गुरुजी त्यां —— खूप रागावले.

४) (अ) 'गाव' या शब्दापासून 'गावकरी' हा शब्द तयार होतो. याप्रमाणे खालील शब्दांपासून शब्द तयार करा.

शेत, काम, गड, खंड, माळ.

(आ) 'दुकान —— दुकानदार' याप्रमाणे खालील शब्दांपासून शब्द तयार करा.

फौज, अम्मल, कारखाना, खाते, बागाईत.

५) खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.

१) शिवा व भिवा पोट कसं भरायचे ?

२) गावात गोंधळ कशासाठी चालला होता.

३) दोघे मित्र का घाबरले ?

४) दोघांना काय युक्ती सुचली ?

५) त्यांनी प्राण कसे वाचवले ?

---

# 3 गणेशोत्सव



बहुतेक सर्व धर्मात उत्सव किंवा सण यांची खूप रेलचेल आहे. दरवर्षी हिंदू लोकही अनेक धार्मिक सण साजरे करतात. आपल्या महाराष्ट्रातील गणेशोत्सव हा असाच एक महत्त्वाचे स्थान मिळालेला धार्मिक तसेच सामाजिक सण आहे.

भाद्रपद शुद्ध चतुर्थीपासून साधारणपणे अनंत चतुर्दशीपर्यंत दरवर्षी हा उत्सव करतात. लोक मुद्दाम तयार केलेल्या गणपतीच्या मूर्ती विकत आणतात. गणपतीपुढे सुंदर आरास केलेली असते. यामुळे दरवर्षी त्यात नवलाई येते. प्रत्येक जण आपापल्या परंपरेनुसार कमीजास्त दिवस गणपती घरी ठेवतात. जास्तीत जास्त दहा दिवसांनी थाटात गणपतीचे विसर्जन करतात. यावेळी सारा आसमंत " गणपतीबाप्पा मोरया । पुढच्या वर्षी लवकर या ।। " या आरोळ्यांनी नुसता दुमदुमत असतो.

गणेशोत्सव हा भारतातील अनेक प्रदेशात साजरा केला जात असला तरी त्याला सामाजिक उत्सवाचं स्थान महाराष्ट्रातच मिळालं आहे. लोकमान्य टिळकांनी लोकांना एकत्र आणावे या हेतूने हा सार्वजनिक उत्सव सुरू केला. पारतंत्र्याच्या काळात या उत्सवाने जनजागृतीचे फार मोठे कार्य केले. अजूनही या निमित्ताने वादविवाद, व्याख्याने, परिसंवाद, निबंधस्पर्धा असे अनेक कार्यक्रम सादर केले जातात. तसेच नाटके, नृत्य, गायन, भजन, पोवाडे, कीर्तन यांसारखे मनोरंजनपर कार्यक्रमही असतात. या कार्यक्रमातून महाराष्ट्रीय संस्कृतीचे दर्शन होते. अनेक स्पर्धा ठेवून लहान-मोठ्यांना उत्तेजनही देण्यात येते.

असा हा महाराष्ट्राला अभिमान वाटावा असा उत्सव ! यात धार्मिक बळ आहे, सामाजिक जबाबदारीची, ऐक्याची भावना आहे ; तसेच कलात्मक आविष्कारही आहे.

## अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

१) गणेशोत्सव कसा साजरा करतात ?
२) महाराष्ट्रात गणेशोत्सवाला जास्ती महत्त्व का आहे ?
३) तुम्हाला गणपतीबद्दल माहिती असलेली गोष्ट सांगा.
४) गणपती-उत्सव पारतंत्र्याच्या काळात का महत्त्वाचा होता ?
५) गणेशोत्सवाला सामाजिक उत्सवाचे स्थान कोणी दिले ?

२) खालील शब्दांपैकी समानार्थी शब्दांवर ✓ खूण खरा.

१) उत्सव —— महोत्सव, सण, दिवस
२) स्थान —— नदी, ठिकाण, आकाश
३) आरास —— कालासुर, सजावट, आरसा
४) मनोरंजन —— आनंद, वादन, करमणूक
५) नृत्य —— गायन, नाच, तबला

३) अनेक शब्दाबद्दल एक शब्द निवडा.

| A | B |
|---|---|
| १) मनाचे रंजन —— | दरवर्षी |
| २) गणेशाचा उत्सव —— | जनजागृती |
| ३) सर्व लोकांसाठी | गणेशोत्सव |
| ४) लोकांमध्ये जागृती —— | सार्वजनिक |
| ५) प्रत्येक वर्षी —— | मनोरंजन |

४) कंसातील शब्दांची योग्य रूपे वापरा

(उदा.—तो नाचता नाचता पडला.— (नाचणे)

१) वीणा सिनेमा (पाहणे) झोपली.
२) आई स्वेटर (विणणे) गप्पा मारते.
३) उमेश (बोलणे) हसत होता.
४) ते शाळेत (जाणे) खेळतात.
५) हे झाड (बघणे) वाढलं.

५) खालील वाक्ये पूर्ण करा.

मालकाच्या बायकोला **मालकीण** म्हणतात.

१) सुताराच्या बायकोला —— म्हणतात.

२) लोहाराच्या बायकोला —— म्हणतात.

४) धोब्याच्या बायकोला —— म्हणतात.

५) शेतकऱ्याच्या बायकोला —— म्हणतात.

———

# 4 आपला देश

आपल्या देशाचं नाव भारत आहे. भारत एक विशाल आणि मोठा देश आहे.




भारत देश अतिशय सुंदर आहे. याच्या उत्तरेला जगातील सर्वात उंच पर्वत हिमालय आहे; तर दक्षिणेला हिन्दमहासागर पसरलेला आहे. देशाच्या पूर्वेला ब्रह्मदेश आणि पश्चिम दिशेला पाकिस्तान आहे.

भारत देश विविधता व सुंदरतेनी नटलेला आहे. कुठे हिमालय, सह्याद्रि, विंध्य, सातपुडा, व निलगिरी यांसारखे उत्तुंग पर्वत आहेत तर कुठे गंगा, कृष्णा, जमुना कावेरी, ब्रह्मपुत्रा यांसारख्या नद्या आहेत. कुठे दाट जंगले आहेत, तर कुठे सपाट पठारे आहेत. कुठे वैराण वाळवंटे आहेत तर कुठे हिरवीगार सुपीक जमीन आहे.

आपल्या देशात हिंदु मुस्लिम, शीख ख्रिश्चन इत्यादि अनेक धर्मांचे व जातीचे लोक रहातात. हे सगळे निरनिराळ्या भाषा बोलतात. यांची वेशभूषा व रितीरिवाज निरनिराळे आहेत. खाण्यापिण्याच्या पद्धती भिन्न आहेत. पण तरीही सर्वजण भारतीय आहेत. सर्वजण एकत्र प्रेमाने रहात आहेत. सर्वजण एकमेकांना मदत करतात. कित्येकवेळा एकमेकांचे सणही साजरे करतात.

आपल्या देशात अनेक थोर पुरुष व स्त्रिया होऊन गेल्या. राम, कृष्ण, गौतम, गांधी यांसारखे महापुरुष इथे जन्मले. नानक, ज्ञानेश्वर, मीराबाई, तुलसीदास यांसारखे संत तर भीम, अर्जुन, प्रताप, शिवाजी, भगतसिंह, राणी लक्ष्मीबाई यांसारखे वीर इथे होऊन गेले. भारतमातेला यांचा अभिमान वाटतो. मुलांनो, प्रयत्न केलात तर तुमच्यातूनही असे थोर पुरुष व स्त्रिया निर्माण होतील.



आपला देश मुख्यतः खेड्यांचा देश आहे. पण तरीही भारतात अनेक मोठमोठी सुंदर शहरे आहेत. भारताची राजधानी दिल्ली आहे. मुंबई, बेंगळूर, मद्रास, कलकत्ता, कानपुर, अहमदाबाद



वगैरे भारतातील मुख्य शहरे आहेत. येथे मोठमोठे कारखाने आहेत. भारतात अनेक खाणी व बंदरे आहेत. भारतातील खेडी मुख्यतः निसर्गसौंदर्यासाठी पहाण्यासारखी आहेत.

भारतात अनेक प्रेक्षणीय स्थळे आहेत. यात आग्र्याचा ताजमहाल, दिल्लीचा कुतुबमीनार व लालकिल्ला, अमृतसरचे सुवर्णमंदिर, अजंठा वेरूळची लेणी व दक्षिणेकडील मंदिरे--कन्याकुमारी, रामेश्वर, ही महत्त्वाची आहेत. हे सर्व पहाणारे प्रवासी आश्चर्याने थक्क होतात.

अशा आपल्या देशाबद्दल प्रत्येकालाच अभिमान व प्रेम वाटते. या देशाची प्रगती हीच आपली प्रगती आहे.

## अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

१) आपल्या देशाचे नाव काय ?

२) भारतातील प्रमुख नद्या कोणत्या ?

३) भारतातील महापुरुषांची नावे सांगा.

४) भारतातील प्रमुख शहरे कोणती ?

५) भारतातील प्रमुख प्रेक्षणीय स्थळे कोणती ?

२) कंसातील शब्दांपैकी योग्य तो शब्द वापरून वाक्ये पूर्ण करा.

सपाट, सुपीक, वैराण, वेगवेगळ्या, उत्तुंग, दाट, खळाळणाऱ्या, प्रेक्षणीय.

१) भारतात कुठे ——— जमीन आहे, तर कुठे ——— वाळवंट !
२) भारतात कुठे ——— पर्वत आहेत, तर कुठे ——— नद्या !
३) आपल्या देशात कुठे ——— जंगले आहेत तर कुठे ——— पठारे !
४) भारतात निरनिराळे लोक ——— भाषा बोलतात.
५) आपल्या देशात अनेक ——— स्थळे आहेत.

२) **हे पहाणारे प्रवासी थक्क होतात.** (पहाणे) याप्रमाणे खाली दिलेल्या वाक्यात कंसातील शब्दांची योग्य रूपे वापरा.

१) काम ——— माणसे सशक्त असतात. (करणे)
२) ——— मुले सर्वांना आवडतात. (हसणे)
३) फुगे ——— रोज दारावरून जातो. (विकणे)
४) मला ——— मूल आवडत नाही. (रडणे)
५) मला बाबांनी ——— आगगाडी दिली. (धावणे)

३) खाली दिलेल्या उदाहरणानुसार कंसातील शब्दांचे योग्य रूप बनवून वाक्ये पूर्ण करा.

अ) सीता हसते. (हसणे)

१) माया ——— (पळणे)
२) मुलगी ——— (लिहिणे)

आ) राम हसतो (हसणे)

१) उमेश ——— (गाणे)
२) भाई ——— (वाचणे)
३) मुलगा ——— (रडणे)

इ) मुळे हसतात (हसणे)

१) मुली —— (रडणे)

२) लोक —— (पहाणे)

३) मुलगे —— (मारणे)

४) खालील शब्दांच्या जोड्या ला. जसे पुरुष × स्त्री.

| | |
|---|---|
| हत्ती | कावळी |
| वाघ | चिमणी |
| मोर | घोडी |
| चिमणा | मुलगी |
| कावळा | वाघीण |
| घोडा | गाय |
| मुलगा | लांडोर |
| बैल | हत्तीण |

— ——

# 5 ज्योत




आधी होते मी दिवटी
झाले इवली मग पणती
समई केले मला कुणी
निघुनी आले बाहेर
काचेचा मग महाल तो
कंदिल त्याला जन म्हणती

शेतकऱ्यांची आवडती
घराघरांतुन मिणमिणती ! ॥
देवापुढती नेवोनी
सोडित काळासा धूर ! ॥
कुणी बांधुनी मज देतो
मीच तयातील परि ज्योती ! ॥

बत्तीचे ते रूप नवे  पुढे मिळाले मज बरवे
बरात मजवाचून अडे  झगझगाट तो कसा पडे ! ॥

आता झाले मी बिजली  घरे मंदिरे लखलखली
देवा ठाऊक काय पुढे  नवा बदल माझ्यात घडे ! ॥

एकच ठावे काम मला  प्रकाश द्यावा सकलांना
कसलेही मज रूप मिळो  देह जळो अन् जग उजळो ॥

—वि. म. कुलकर्णी.

## अभ्यास

५) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

१) ज्योतीची निरनिराळी रूपे सांगा.
२) ज्योतीचे कोणते रूप तुम्हास सर्वात जास्त आवडते ?
३) ज्योतीला कोणते काम ठाऊक होते ?
४) ज्योतीचे ध्येय काय आहे ?

२) उदाहरणानुसार खाली दिलेल्या शब्दांची रूपे द्या.

उदा.— पणती  पणत्या

१) दिवटी
२) बत्ती
३) नदी
४) आगगाडी
५) समई

३) विरुद्धार्थी शब्दांच्या जोड्या लावा.

| | |
|---|---|
| १) प्रकाश | मोठी |
| २) महाल | आत |
| ३) आवडती | झोपडी |
| ४) बाहेर | अंधार |
| ५) इवली | नावडती |

४) 'तून' 'आणि' 'हून' यापैकी योग्य तो शब्द वापरून वाक्ये पूर्ण करा.

१) समई देवघरा ——— बाहेर आली.
२) मुंबई ——— पुण्याला यायला तीन तास लागतात.
३) सिंह गुहे ——— बाहेर पडला.
४) तुझ्या ——— मी उंच आहे.
५) घरा ——— दादा ओरडले.

४) कंसातील योग्य शब्द वापरून वाक्ये पूर्ण करा.

१) समईला काचेचा महाल ——— (मिळाली, मिळाला)
२) मग ती इवली पणती ——— (झाले, झाली, झाली)
३) देवघरातून समई बाहेर ——— (आलो, आले, आली)
४) मी शाळेत पहिला ——— (आलो, आले, आलीस)
५) तुम्ही परिक्षेत पास ——— (झालात, झालास, झालो)

— — —

# 6 दसरा

भारतात अनेक प्रकारचे सण साजरे केले जातात. सणाच्या दिवशी पुराणकाळातील कोणत्या तरी महान व्यक्तीची आठवण ठेवून तिची पूजा करतात, आणि आनंदाने तो दिवस साजरा करतात. भारतातील अनेक सणांपैकी दसरा हा एक प्रसिद्ध सण आहे. सर्व भारतात हा सण साजरा केला जातो. याला वेगवेगळ्या विभागात वेगवेगळी नावे आहेत व वेगवेगळ्या तऱ्हेने तो साजरा केला जातो. हा सण दहा दिवस साजरा करतात. पहिले नऊ दिवस पूजा करतात. दहाव्या दिवशी मोठा उत्सव असतो. या दिवसाला महाराष्ट्रात विजया दशमी म्हणतात.

कर्नाटकात या दिवसात 'नाडहब्बा' हा उत्सव असतो. बंगालमध्ये नवरात्रात दुर्गापूजेचा महोत्सव असतो, गुजरातेत गर्बा नृत्याचा थाट उडतो. उत्तर हिंदुस्थानात रामलीलेची मौज असते. उत्तर हिंदुस्थानात याला दशहरा म्हणतात. उत्तर हिंदुस्थानात या दिवसात रामायणातील निरनिराळ्या प्रसंगांवर नाटके करून या दिवशी रावणाचा मोठा पुतळा करून जाळतात. दक्षिणभारतात आपल्या प्रमाणेच देवींचे मुखवटे सजवून त्याच्यापढे आरास करतात. त्याला 'कोलू' म्हणतात.

या सणाच्या बाबतीत अनेक कहाण्या आहेत. यापैकी दोन कहाण्या प्रमुख आहेत. एका कहाणीप्रमाणे या दिवशी रामचंद्रांनी रावणाला मारले आणि दुसऱ्या कहाणीप्रमाणे या दिवशी दुर्गादेवीने महिषासुर नावाच्या राक्षसाला मारले. ही दोन्ही युद्धे नऊ दिवस चालली होती, यासाठी नऊ दिवस देवाची पूजा करतात दहाव्या दिवशी राक्षस हरले आणि देवांना विजय मिळाल यासाठी दहाव्या दिवसाला 'विजया दशमी' म्हणतात. तो दिवस आनंदाने साजरा करतात. दहा तोंडांचा रावण हरला म्हणून या सणाला 'दशहरा' ही म्हणतात. या दोन्ही कहाण्या जरी भिन्न असल्या तरी दोन्हीचे तात्पर्य एकच आहे. या दिवशी वाईटाचा नाश झाला आणि चांगल्याला विजय मिळाला. लोक त्रासातून मुक्त झाले. यासाठी हा सण साजरा करतात.

महाराष्ट्रात या दिवशी सोने म्हणून आपट्याची पाने लुटतात. कौत्साने या दिवशी पराक्रमाने कुबेराचा खजिना लुटून गुरुदक्षिणा दिली. याची आठवण, यादिवशी मोठ्यांना आपट्याची पाने देऊन करतात. यासाठीही मनोरंजक कहाणी सांगितली जाते.

यावेळी पाऊस संपलेला असतो. पिके डोलत असतात. आकाश निरभ्र असते. याच दिवसात पूर्वी मराठे मुलुखगिरी करायला बाहेर पडत असत. या दिवशी सीमोल्लंघन करातात, सीमोल्लंघन म्हणजे सीमा ओलांडून नवे पराक्रम करायचे. आनंद, उत्साह यावेळी भरून राहिलेला असतो. सगळे लोक नवे नवे कपडे घालतात. गोड पक्वान्ने करतात व आनंदात दिवस घालवतात.

या आनंदाचे वर्णन असे केले जाते.—
" दसरा सण मोठा । नाही आनंदा तोटा ॥ "

## अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

१) महाराष्ट्रात दसरा साजरा करतात यावेळी सर्व देशभर कायकाय करतात ?
२) दसऱ्याच्या प्रमुख कहाण्या कोणत्या ?
३) दसरा दहा दिवस का साजरा करतात ?
४) सीमोल्लंघन म्हणजे काय ?
५) उत्तर हिंदुस्थानात दशहरा कसा साजरा करतात ?

२) रिकाम्या जागी 'ने' किंवा 'नी' यापैकी योग्य तो शब्द वापरा.

१) रामा ........ रावणास मारले.
२) प्रभू रामचंद्रां ........ रावणाला मारले.
३) दुर्गादेवी ........ महिषासुर नावाच्या राक्षसाला मारले.
४) मी सुरी ........ आंबा कापतो.
५) लोक आनंदा ........ दसरा साजरा करतात.



मैसूरचा
दसरा



दुर्गापूजा



कोल्ह



रावणाचा पुतळा

३) खालील विरुद्धार्थी शब्दांच्या जोड्या लावा.

| | |
|---|---|
| गरीब | मूर्ख |
| मित्र | श्रीमंत |
| शहाणा | दुःख |
| शूर | भित्रा |
| आनंद | जुना |
| नवा | शत्रू |

४) 'न' 'चा' 'ची' यापैकी योग्य ते अक्षर वापरून खालील वाक्ये पूर्ण करा.

१) महाराष्ट्रा — दसरा साजरा करतात त्याचवेळी,
२) कर्नाटका —— नाडहब्बा साजरा करतात.
३) गुजराते —— गर्बा नृत्या —— थाट उडतो.
४) उत्तरहिंदुस्थाना —— रामलीले —— मौज असते तर
५) बंगाला —— दुर्गापूजे —— महोत्सव असतो.

५) कंसातील शब्दांपैकी योग्य त्या समानार्थी शब्दावर बरोबरची खूण करा.

| | |
|---|---|
| उदा.— विजय | (जय, पराजय, लढाई) |
| १) कहाणी | (गोष्ट, गाणे, कविता) |
| २) रात्र | (अंधार, काळोख, रात) |
| ३) नृत्य | (गाणे, संगीत, नाच) |
| ४) देव | (राक्षस, दानव, परमेश्वर) |

———

# 7 बाल-दिवस

आज १४ नोव्हेंबर ! बाल-दिवस ! शाळा खूप सजवली आहे. आज मुले खूप उत्साहात आहेत. आज शाळेत अनेक कार्यक्रम होणार आहेत. प्रथम मुलांची सभा, मिठाई वाटणे, खेळांच्या स्पर्धा, रात्री सांस्कृतिक कार्यक्रम व बक्षिस समारंभ !

सर्व मुले सभागृहात बसली आहेत. मध्यभागी चाचा नेहरूंचा रुबाबदार फोटो आहे. फोटोला लाल गुलाबाची फुले वाहिलेली आहेत. पं. नेहरूंना लाल गुलाब अतिशय आवडत असे. प्रथम मुलांची भाषणे झाली. शेवटी सभापतींनी भाषणाला सुरवात केली.

"मुलांनो, नेहरूजी एक महान पुरुष होते. त्यांचे पूर्ण नाव पं. जवाहरलाल नेहरू होते. त्यांचा जन्म १४ नोव्हेंबर १८८७ ला अलाहाबाद येथे झाला. त्यांचे वडिल मोतीलाल नेहरू एक कुशल वकील व नेता होते.

चाचा नेहरूंचे प्राथमिक शिक्षण घरीच झाले. उच्च शिक्षणासाठी ते विलायतेला गेले. बॅरिस्टर होऊन ते परत आले. त्यांनी देश परतंत्र असलेला पाहून, वाकिली न करता देश स्वतंत्र करण्याचा पण केला. खेड्या-पाड्यात जाऊन त्यांनी स्वातंत्र्याच्या संदेश दिला. अनेक वेळा सत्याग्रह केले. यांसाठी त्यांना बऱ्याच वेळा तुरुंगात जावे लागले.

शेवटी १५ आगस्ट सन १९४७ रोजी आपला भारत देश स्वतंत्र झाला. स्वतंत्र भारताचे पहिले प्रधानमंत्री म्हणून ते निवडले गेले. देश अधिक संपन्न करण्यात ते गुंतले. त्यांनी 'आराम हराम आहे.' असा जगाला संदेश दिला. सर्व जगात शांतता नांदावी यासाठी त्यांनी अनेक प्रयत्न केले. त्यामुळे त्यांना 'शांतीदूत' म्हणतात.

चाचा नेहरू कुशल नेता तसेच उत्तम लेखकही होते. तुरुंगात असताना त्यांनी 'माझी कहाणी' व 'भारताचा शोध' ही पुस्तके लिहिली. त्यांनी पुष्कळ लिहिले व वाचले. तुम्ही मोठे झाल्यावर त्यांची सर्व पुस्तके वाचा. त्यांना निसर्ग व पशु-पक्ष्यांबद्दलही प्रेम होते.



त्यांना सर्वात जास्त प्रेम मुलांबद्दल होते. ते मुलात मूल होऊन खेळायचे. त्यांच्या बरोबर बोबडं बोलायचे. मुलांनाही त्यांच्या बद्दल खूप प्रेम होते. ती त्यांना 'चाचा नेहरू म्हणायची.

यासाठी दरवर्षी १४ नोव्हेंबर हा त्यांचा जन्म-दिवस 'बालदिवस' म्हणून साजरा करतात. आज ते आपल्यात नाहीत. परंतु प्रत्येकाला आज त्यांची आठवण येते. त्यांच्या महान कार्याची आठवण येते.

मुलांनो, आज बाल-दिवस आहे. तुमचा दिवस! तुम्ही सर्वजण भारताचे भविष्य आहात. चाचा नेहरूंची सर्व स्वप्ने तुम्हीच साकार करणार आहात. तुमच्या प्रयत्नांनीच भारताची प्रगती होणार आहे. चाचाजींप्रमाणे प्रयत्नवादी देशभक्त व्हा ".

यानंतर बाल-सभा संपली. आणि मुलांना मिठाई वाटण्यात आली.

## अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

   १) चाचा नेहरूंचा जन्म कधी झाला ?
   २) भारताचे प्रथम पंतप्रधान कोण होते ?
   ३) १४ नोव्हेंबर 'बालदिवस' म्हणून का साजरा करतात ?
   ४) चाचा नेहरूंनी कोणती पुस्तके लिहिली ?
   ५) 'बाल-दिवस' तुम्ही कसा साजरा कराल ?

२) उदाहरणानुसार कंसातील शब्दांची योग्य रूपे वापरा.

अ) मी उद्या गावाला **जाणार आहे.** (जाणे)

१) मी ते झाड —— —— (कापणे)

२) मी रामबरोबर —— —— (खेळणे)

३) सीता काम —— —— (करणे)

४) मांजर दूध —— —— (पिणे)

आ) तु खेळायला **येशील** का ? (येणे)

१) तू गावाला —— का ? (जाणे)

२) तू मला खाऊ —— का ? (दे)

३) उदाहरणानुसार पुढे दिलेल्या शब्दांची रूपे बदला.

| एक रेघ | अनेक रेघा |
|---|---|
| १) चप्पल | |
| २) माळ | |
| ३) धार | |
| ४) शीर | |
| ५) नस | |

४) खालील शब्दांच्या जोड्या लावा. जसे : एक × पहिला.

| | |
|---|---|
| एक | सातवा |
| दोन | पंधरावा |
| तीन | पाचवा |
| चार | तिसरा |
| पाच | दुसरा |
| सात | पहिला |
| पंधरा | चौथा. |

४) कंसातील शब्दांपैकी योग्य ते शब्द वापरा.

(सत्याग्रह, सत्यवचनी, वकिल, संकोची, शांतीदूत)

१) जो दुसऱ्यांजवळ संकोच करतो ——

२) जो वकिली करतो ——

३) जो नेहमी खरे बोलतो ——

४) जो शांतीचा संदेश देतो ——

५) सत्यासाठी आग्रह ——

———

# 8 विसराळु विनू

आमच्या शेजारी एक मुलगा रहातो. त्याचे नाव विनू. त्याला सर्वांना मदत करायची, खूप काम करायची मोठी हौस; पण विनू आहे मुलखाचा धांदरट आणि विसराळू! त्याच्या एकेक गमती ऐकाल तर हसून हसून पोटात दुखेल तुमच्या !



शाळेत जाताना विनूचे कपडे कधी नीट नसायचे. कधी सदरा उलटा तर कधी विजार उलटी. सदरा नीट घातला तर त्याची बटणे वर खाली लावलेली ! पायात कधी वहाणा नसायच्या. असल्या तर एक तपकिरी अन् एक काळी ; एकीचा अंगठा तुटलेला !

विनू कधीच वेळेवर शाळेत जायचा नांही. एक दिवस विनूने ठरविले, की, घंटा होण्यापूर्वी शाळेत जायचेच. तो लवकर शाळेत गेला. शाळेची दारे बंद होती. आवारात कोणी

नव्हते. गुरुजी नाहीत. मुले नाहीत. शिपाई नाही. विनूला वाटले की, आपण आज सगळ्यांपेक्षा लवकर आलो. बराच वेळ झाल्यावर त्याच्या लक्षात आले, आज तर सुट्टी !

एके दिवशी सकाळी दूधवाला आलाच नाही. आईने सांगितले. "विनू, हा एक रुपया घे आणि दूध आण. पळ, लौकर ये. रस्त्यात रमू नकोस, माझा शहाणा बाळ तो!"

पैसे मुठीत घट्ट धरून विनू पळतपळत डेअरीत गेला. त्याने दूध मागितले. पण ते घ्यायचे कशात ? त्याने भांडे नेलेच नव्हते. विनू पळत घरी गेला. आई म्हणाली, "अरे, तुझ्या अंगातला सदरा धुवायला काढून दे"

विनूने मुठीतले पैसे फळीवर ठेवले. सदरा काढला. दुसरा धुतलेला सदरा घातला आणि भांडे घेऊन तो एकदम डेअरीकडे धावत सुटला. डेअरीत गेल्यावर दुधवाल्याला भांडे दिले. पण त्याला द्यायला विनूजवळ पैसे होते कुठे ? तो पैसे फळीवरच विसरून आला होता. दूधवाला हसू लागला. पैसे आहेत तर भांडे नाही, भांडे आहे तर पैसे नाहीत ! पैसे आणायला पुन: हेलपाटा !

सगळ्यात मौज झाली ती गेल्या पावसाळ्यात. शाळेत बागकाम चालू होते. प्रत्येक मुलाला एकेक वाफा मिळाला. गुरूजी म्हणाले, "वाफा कसा करायचा हे तुम्हाला माहीत आहेच. आता तसेच वाफे तयार करा. त्यात मेथी पेरून रोज पाणी द्या. पाहू कुणाच्या वाफ्यात छान भाजी येते. त्याला पहिले बक्षीस मिळणार !"

सगळ्या मुलांबरोबर विनूनेही वाफा तयार केला. रोज मन लावून पाणी दिले. सर्वांना खात्री वाटली की आता पहिले बक्षीस नक्की विनूला मिळणार.

आठ दिवसात इतरांच्या वाफ्यात मेथी उगवली. विनूच्या वाफ्यात मात्र काहीच उगवले नाही. असे कसे झाले ? विनू बी पेरायला विसरला होता. पेरलेच नाही तर उगवणार काय ?

## अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

१) विनूच्या धांदरटपणामुळे घडलेल्या प्रसंगातील सर्वात कुठला प्रसंग तुम्हाला आवडला ?

२) दूध आणण्यासाठी विनूला का हेलपाटे पडले ?

३) दूधवाल्याला का हसू आले ?

४) विनूच्या वाफ्यात काहीच का उगवले नाही ?

५) तुमच्या विसराळूपणामुळे घडलेला एखादा विनोदी प्रसंग सांगा.

२) वाक्य पूर्ण करा.

१) दूध विकणाऱ्याला दूधवाला म्हणतात.

२) केळी विकणाऱ्याला —— म्हणतात.

३) भाजी विकणाऱ्याला —— म्हणतात.

४) पेरू विकणाऱ्याला —— म्हणतात.

५) रिक्षा चालवणाऱ्याला —— म्हणतात.

पण

१) कपडे धुणाऱ्याला —— म्हणतात.

२) स्वैपाक करणाऱ्याला —— म्हणतात.

३) कपडे धुणाऱ्याला —— म्हणतात.

४) बागेचे काम करणाऱ्याला —— म्हणतात.

५) मडकी करणाऱ्याला —— म्हणतात.

३) कंसातल्या शब्दांची योग्य रूपे द्या.

विनूने धुतलेला सदरा घातला. (धुणे)

१) चांभाराने चपलेचा — — अंगठा शिवला. (तुटणे)

२) मला शेवटी —— कप मिळाला (फुटणे)

३) मी —— भाजी उगवली. (पेरणे)

४) पोपटाने —— पेरू गोड लागतो. (खाणे)

५) त्याची —— सायकल सापडली (हरवणे.)

३) खालील वाक्यात चा, ची, चे, च्या, झा, झी, झे, झ्या यापैकी योग्य ते अक्षर वापरून वाक्ये पूर्ण करा.

१) पण विनू आहे मुलखा - - - - धांदरट.

२) मा ........ वर्गात नेहमी पहिला नंबर येतो.

३) शाळे ........ दारे बंद होती.

४) तु ........ आईने मला खाऊ दिला.

५) विनू ........ वाफ्यात मात्र काहीच उगवले नाही.

६) तु ........ चप्पल तुटली आहे.

७) मा ........ बाबा गावाला गेले आहेत.

८) विनू ........ कपडे कधी नीट नसायचे.

४) कंसातील शब्दांपैकी योग्य ते शब्द भरा.

१) जो नीट अभ्यास करेल तो पहिला ........ (येतो, येईल)

२) मी उद्या मुंबईला ........ (जातो, जाईन, जातील)

३) रामू अमेरिकेतच ........ (राहतील, राहील, राहींन)

४) आम्ही सुट्टीत खूप आंबे ........ (खाईन, खाऊ, खाईल)

५) तू अभ्यास - - - - का ? (कराल, करीन, करशील)

———

# 9 शरीराची सफाई

रमेश :—उमेश, हल्ली अभ्यास करायला उत्साहच वाटत नाही. सगळा दिवस आळसात जातो. सारखी झोप येते. आणि परीक्षा तर दिवसे न दिवस जवळ येते आहे.



उमेश :—तुला जर वाईट वाटणार नसेल तर मी एक गोष्ट सांगतो.

रमेश :—सांग रे. जर माझ्या चांगल्यासाठी सांगितलस तर मला कशाला वाईट वाटेल ?

उमेश :—अशी एक म्हण आहे की 'शरीर, जर निरोगी असेल तर मनही निरोगी राहते.' शरीर निरोगी असेल तर प्रत्येक कामात लक्ष लागेल. मला असं वाटतं की तू शरीराच्या सफाईकडे लक्षच देत नाहीस.



रमेश :—छे रे ! मी तर रोज नियमाने अंघोळ करतो.

उमेश :—अंगावर बादलीभर पाणी ओतून अंघोळ होत नाही. स्वच्छ पाण्याने अंघोळ केली पाहिजे. अंघोळ करताना अंग स्वच्छ चोळले पाहिजे. नंतर स्वच्छ धुतलेल्या खरखरीत टॉवेलने अंग कोरडे केले पाहिजे. यामुळे शरीराचा सर्व मळ निघून जाईल. अंघोळीपूर्वी सकाळी उठल्याउठल्या दात स्वच्छ घासले पाहिजेत. दात स्वच्छ करण्यासाठी मंजन, टूथपेस्ट वगैरेंचा उपयोग केला पाहिजे. याचवेळी न चुकता



थंडपाण्याने डोळे स्वच्छ धुतले पाहिजेत. पहा तुझी नखं पण किती वाढली आहेत आणि त्यात मळही खूप आहे. हीच नखातली घाण जेवताना पोटात जाते आणि निरनिराळे आजार होतात.

रमेश :—खरच ! बाबा मला नेहमीच याबद्दल रागावतात. मी आजच नखं कापीन.

उमेश :—रोज सकाळी व्यायमही करत जा. व्यायामामुळे शरीर एकदम निरोगी रहाते. आमचा भाईदादा पहा. तो किती दणकट आहे आणि कधीही आजारी पडत नाही. तो तुला व्यायाम करायला शिकवेल. तसेच मळकट कपडेही आजार व आळसटपणाचे मूळ असतात. आपले कपडे, वस्तू आणि घर सदैव स्वच्छ ठेवले पाहिजे. या गोष्टी लक्षात ठेवून वागलास तर तू प्रत्येक कामात उत्साही रहाशील ; आणि अभ्यासही खूप होईल.

रमेश :—खरच प्रयत्न करून पहायला काय हरकत आहे ? मी उद्यापासून तुझ्या सांगण्याप्रमाणे वागून पहातो. भाईदादाला न विसरता सांग की मी उद्यापासून त्याच्याकडे यायला लागीन.

## अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

१) शरीराची सफाई का करायची असते ?

२) अंघोळ कशी करावी ?

३) शरीराची सफाई म्हणजे कशाकशाची सफाई ?

४) शरीरा बरोबरच कशाची सफाई आवश्यक आहे ?

५) व्यायामाची आवश्यकता का आहे ?

२) उदाहरणानुसार कंसातील शब्दांची योग्य रूपे द्या.

उदा.—तू न विसरता भाईदादाला सांग. (विसरणे)

१) रोज —— डोळे धुवावेत. (चुकणे)
२) तो —— भाषण करेल. (भिणे)
३) ती —— शाळेत गेली. (रडणे)
४) उमेश —— झाडावर चढतो. (घाबरणे)
५) रमेश अंघोळ —— शाळेत येतो. (करणे)

३) खालील शब्दांपैकी समानार्थी शब्दांवर बरोबरची खूण करा.

१) रोग —— दवाखाना, आजार, रोगी.
२) सफाई —— स्वच्छ, स्वच्छता, सफेद.
३) शरीर —— धड, आरोग्य, अंग.
४) कोरडे —— सुके, ओले, दमट
५) दणकट —— धीट, धिप्पाड, कणखर.

३) दिवसेनदिवस :— खूप दिवस, एकेक दिवस.

कपडानकपडा — प्रत्येक कपडा

" परिक्षा दिवसेनदिवस जवळ येतेय. "

" कंसातील शब्दांची वरीलप्रमाणे योग्य रूपे देऊन ती वाक्ये पुनः लिहा. "

१) तो (घर) हिंडला.
२) ती साडी घेण्यासाठी मी (दुकान) हिंडले.
३) शांतीने (भांडे) स्वच्छ घासले.
४) तो (कोपरा) झाडतो.
५) त्याने (झाड) झाड तोडले.

४) उदाहरणानुसार खालील शब्दांचे अर्थ लिहा.




अ) बसल्याबसल्या ___ बसूनच

१) उभ्याउभ्या ___

२) निजल्यानिजल्या ___

३) पडल्यापडल्या ___

पण :___

आ) उठल्याउठल्या ___ उठल्याबरोबर

१) खाल्ल्याखाल्ल्या ___

२) वाचल्यावाचल्या ___

३) धुतल्याधुतल्या ___

# 10 आपला प्रदेश–महाराष्ट्र

हा शेजारचा नकाशा पहा. हा आपल्या देशातील महाराष्ट्र राज्याचा नकाशा आहे. याच्या पश्चिमेकडे अरबी समुद्र आहे. गुजरात, मध्यप्रदेश, आन्ध्रप्रदेश, कर्नाटक आणि गोवा आपली शेजारी राज्ये आहेत.




महाराष्ट्र एक मोठे राज्य आहे. महाराष्ट्रातील सह्याद्रि आणि सातपुडा हे मोठे पर्वत आहेत. महाराष्ट्र त्यातील किल्ल्यांसाठी प्रसिद्ध आहे. किल्ले मराठा सरदारांच्या वीरतेची कहाणी सांगतात.

महाराष्ट्रातील तापी, गोदावरी, भीमा, वर्धा, कृष्णा, नर्मदा या प्रमुख नद्या आहेत. यांनी महाराष्ट्राची जमीन सुपीक बनविली आहे.

महाराष्ट्रातील लोक कष्टाळू आहेत. महाराष्ट्रातील स्त्रियाही पुरुषांबरोबर शेतात व कारखान्यात काम करतात.



महाराष्ट्रात कापूस, शेंगदाणा, ऊस आणि जोंधळा ही मुख्य धान्ये पिकतात. समुद्र किनाऱ्यावरील लोक तांदूळ पिकवतात. आंबा, नारळ आणि केळी ही महाराष्ट्राची मुख्य फळे ! मासेमारी हा ही महाराष्ट्रातील प्रमुख उद्योग आहे.

महाराष्ट्रातील लोकांचे मुख्य अन्न तांदूळ, गहू, जोंधळा, डाळ, भाज्या व दूध हे आहे. काही लोक मासळी व मांसही खातात.

महाराष्ट्राची मुख्य भाषा मराठी आहे. ती देवनागरी लिपीत लिहिली जाते.

महाराष्ट्राची राजधानी मुंबई हे महाराष्ट्रातीलच नव्हे तर भारतातीलही एक अत्यंत महत्त्वाचे औद्योगिक शहर व बंदर आहे. पुणे, नागपुर, सोलापूर कोल्हापूर, औरंगाबाद इत्यादि महाराष्ट्रातील अनेक महत्त्वाची शहरे आहेत.



महाराष्ट्रातील अजंठा, एलोरा, कार्ले, भाजे यांसारखी अनेक लेणी, किल्ले, आणि इतर अनेक ठिकाणे पाहण्यासारखी आहेत. महाराष्ट्रात अनेक धार्मिक ठिकाणेही आहेत. नांदेड येथील गुरू गोविन्द सिंह यांची समाधी, पंढरपूर, नाशिक ही त्यापैकी काही प्रमुख ठिकाणे. तुम्ही महाराष्ट्रातील काही ठिकाणे पाहिली आहेत का? त्यांच्याबद्दल तुम्ही काही सांगू शकाल का?

### अभ्यास

१) खालील प्रश्नांची उत्तरे द्या.

   १) महाराष्ट्राची शेजारी राज्ये कोणती?
   २) महाराष्ट्रातील प्रमुख नद्या कोणत्या?
   ३) महाराष्ट्रातील लोकांचे प्रमुख अन्न कोणते?

४) महाराष्ट्राची भाषा कोणती ? लिपि कोणती ?

५) महाराष्ट्रातील प्रेक्षणीय स्थळे कोणती ?

२) उदाहरणानुसार खाली दिलेल्या शब्दांची योग्य रूपे द्या.

उदा.—केळे केळी.

१) मडके

२) भांडे

३) लोणचे

४) कुत्रे

५) तळे

३) महाराष्ट्राच्या **शेजारची** राज्ये ती शेजारी राज्ये !

याप्रमाणे कंसातील शब्दांची योग्य रूपे वापरा.

१) माझ्या —— मुलगी बुटकी आहे. (समोर)

२) तिच्या —— खुर्ची इकडे आण. (मागे)

३) चिमणीच्या —— खाऊची वाटी उचलू नको. (पुढे)

४) माझ्या —— पुस्तकं तुला देईन. (जवळ)

३) कंसातील शब्दांपैकी योग्य ती रूपे वापरून वाक्ये पूर्ण करा.

१) महाराष्ट्रातील लोक खूप काम ——.

(करतो, करते, करतोस, करतात.)

२) महाराष्ट्राची मुख्य भाषा मराठी ——.

(आहेत, आहेस, आहोत, आहे.)

३) शिवाजी, टिळक यांसारखे महापुरुष महाराष्ट्रात ——.

(झाली, झाला, झाले, आहेत.)

४) मी महाराष्ट्रातली सारी प्रेक्षणीय स्थळे ——.

(पाहतो, पाहतात, पाहू, पाहीन.)

४) खालील शब्दांपैकी समानार्थी शब्दांवर ✓ करा.

१) कष्टाळू —— आळशी, कामकरी, कामसू.

२) उद्योग —— धंदा, काम, कष्ट

३) उद्यान —— फुले, मळा, बाग

४) मुख्य —— पहिला, प्रमुख, एकटा.

५) डोळा —— तोंड, नयन, मुख.

———